राज्यातील वायुवेग पथकांच्या इंटरसेप्टर वाहनांसाठी उपकरणे खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह (परिवहन) विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२३/प्र.क्र.९६/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २ जुलै, २०२४

**वाचा :**

१) केंद्र शासन, वित्त मंत्रालयाचे प्रधान सचिव (वित्त) यांना अग्रेषित केलेले पत्र क्र. F.No.४४ (१)/PF-S/(CAPEX)-Part-VIII/२०२२-२३, दि.२३.०३.२०२३.

२) केंद्र शासन, वित्त मंत्रालयाचे अधिदान व लेखा अधिकारी, खर्च विभाग, वित्त मंत्रालय यांना अग्रेषित केलेले पत्र क्र. F.No.४४ (१)/PF-S/(CAPEX)-Part-VIII/२०२२-२३-SACE-३, दि.२४.०३.२०२३.

३) गृह (परिवहन) विभाग, शासननिर्णय क्र.एमव्हीआर ०३२१/प्र.क्र.४१/परि-२, दि.३१ मार्च,२०२३.

४) मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील दि.१०.०४.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

५) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.पआका/वाहन खरेदी/अंमल२/का-२अ (१२) /२०२३/ जा.क्र.२४१०,दि.१७ फेब्रुवारी,२०२३ व जा.क्र.४९८०, दि.२६ एप्रिल, २०२३.

६) गृह (परिवहन) विभाग, शासननिर्णय क्र. एमव्हीडी ०३२३ / प्र.क्र.९६/ परि-४ दि.०१.०६.२०२३

७) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.पआका/१८७ इंटरसेप्टर व्हेईकल उपकरणे / का.१०/२०२४ / जा.क्र. ७०९८ दि.९ जून, २०२४.

**प्रस्तावना :**

राज्यातील रस्त्यावरील अंमलबजावणी व रस्ता सुरक्षाविषयक जनजागृतीचे काम परिणामकारक होवून अपघातांना आळा घालण्यासाठी उपर्निर्दिष्ट क्र. १ व २ येथील पत्रान्वये केंद्र सरकारने Scheme for special assistance to states for capital investment in २०२२-२३ (RVSF) या योजनेतंर्गत महाराष्ट्र राज्यास Strengthening of enforcement for improving Road safety करीता रु.५७ कोटी विशेष बिन व्याजी कर्ज मंजूर केले आहे. त्यापैकी रु.३८.५० कोटी इतका निधी राज्य शासनास प्राप्त झाला आहे. त्यानुसार उपनिर्दिष्ट वाचा येथील क्र.६ येथील शासन निर्णय अन्वये गृह (परिवहन) विभागाच्या अधिपत्याखालील कार्यरत वायुवेग पथकांसाठी १८७ नवीन इंटरसेप्टर वाहने आवश्यक त्या उपकरणांसह (प्रति वाहन रु.२०.५० लाख या दराने ) खरेदी करण्यास रु.३८,३३,५०,०००/- (अक्षरी रु. अडतीस कोटी तेहतीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली होती. सदर मान्यतेनुसार रु.२४,१२,४५,३२७ /- (रुपये चोवीस कोटी बारा लाख पंचेचाळीस हजार तीनशे सत्तावीस फक्त ) इतक्या रकमेतून केवळ १८७ नवीन

इंटरसेप्टर वाहने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात खरेदी करण्यात आलेली आहेत. यास्तव वायुवेग पथकांसाठी नवीन १८७ इंटरसेप्टर वाहनांसाठी उपकरणे खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता या प्रकरणी शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

उपनिर्दिष्ट क्र.७ येथील परिवहन आयुक्त कार्यालयाच्या प्रस्तावानुसार सदर १८७ नवीन इंटरसेप्टर वाहनांसाठी Laser Speed Gun, Alcohol Breath Analyzer with built in printer and camera व Tyre Tread gauge with Pressure gauge ही उपकरणे खरेदी करण्यास रु. १३,५९,९९,९९९/- (अक्षरी रुपये तेरा कोटी एकोणसाठ लक्ष नव्याण्णव हजार नऊशे नव्याण्णव फक्त) (करासहित) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वाहन उपकरण खरेदी करताना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ व दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, GeM पोर्टलवरील अटी व शर्ती नुसार खरेदी प्रक्रियेची विहित कार्यपद्धती अवलंबवावी.

३. यासाठी येणारा खर्च हा "मागणी क्र.१०, (०१)(०१) राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजना (१०० टक्के केंद्र हिस्सा) अंतर्गत बिनव्याजी कर्ज (५०५५ ००५६) ५१ - मोटार वाहने" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरचा खर्च बिनशर्त स्वरुपाचा आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०२१५४५५३९२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHARAT
RAMCHANDRA
LANGHI

Digitally signed by BHARAT RAMCHANDRA LANGHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=BHARAT RAMCHANDRA LANGHI
Date: 2024.07.02 15:56:57 +05'30'

**(भरत लांघी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री (परिवहन) यांचे अपर मुख्य सचिव
३. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
७. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती (परिवहन-४)